**शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विकवि- १२११/ प्र.२९१/ विप्र-४, दि.१८.११.२०११ मधील अ.क्र.१४ अन्वये, विक्रीकर आयुक्तांना देण्यात आलेल्या अधिकारास दि.३१.१२.२०१७पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय क्र. विकवि-१२१६/प्र.क्र.४/वि.प्र.४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २४ जानेवारी २०१७.

वाचा :- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विकवि-१२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४, दि.१८.११.२०११.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विकवि-१२१४/प्र.क्र.४१८/वि.प्र.४, दि. १४.०१.२०१५.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विकवि-१२१६/प्र.क्र.४/वि.प्र.४, दि.२६.०२.२०१६.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विकवि १२११/प्र.क्र.२९१/विप्र-४,दि.१८.११.२०११ अन्वये विक्रीकर विभागाच्या पुनर्रचनेचा आढावा घेण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयामधील अ.क्र.१४ येथील तरतुदीनुसार, दि.३१.१२.२०१५ अखेरपर्यंतच्या काळात, खात्यातील मंजूर पदसंख्येच्या मर्यादेत, पदांचे अंतर्गत समायोजन व अधिकारी/कर्मचाऱ्यांमधील कामाची वाटणी करण्याची व कामाच्या स्वरुपानुसार फेरबदल करण्याची मुभा विक्रीकर आयुक्तांना देण्यात आली होती. सदर अधिकारास संदर्भाधिन दिनांक १४.०१.२०१५ च्या शासन निर्णयानुसार दि. ३१.१२.२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली. त्यानंतर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विकवि-१२१६/प्र.क्र.४/वि.प्र.४, दि.२६.०२.२०१६ अन्वये विक्रीकर आयुक्तांना असलेल्या या अधिकाराची मुदत दि.३१.१२.२०१६ पर्यंत वाढविण्यात आली आहे.

भविष्यात येऊ घातलेल्या वस्तू व सेवा कर कायद्याच्या अनुषंगाने वाढणा-या व्यापा-यांची संभाव्य संख्या, तसेच कार्यपद्धतीत येऊ घातलेले बदल लक्षात घेऊन खात्याची पुनर्रचना करण्याचे प्रस्तावित आहे. तथापि, या पुनर्रचनेबाबतचा आढावा घेणे, त्यानुसार शासनास मंजूरीसाठी प्रस्ताव पाठविणे, यास काही कालावधी लागणार आहे. त्यामुळे, या दरम्यानच्या काळात उपलब्ध मंजूर मनुष्यबळाचे समायोजन करणे व कामाची वाटणी करणे याबाबत फेरबदल करण्याची आवश्यकता भासण्याची शक्यता आहे. यास्तव, विक्रीकर आयुक्तांना दि.१८.११.२०११ च्या शासन निर्णयातील अ. क्र. १४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास दि.३१.१२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विकवि १२११/प्र.क्र.२९१/विप्र-४,दि.१८.११.२०११ मधील अ.क्र.१४ येथील तरतुदीनुसार दि.३१.१२.२०१४ अखेरपर्यंतच्या काळात खात्यातील मंजूर पदसंख्येच्या मर्यादेत पदांचे अंतर्गत समायोजन व अधिकारी / कर्मचाऱ्यांमधील कामाची वाटणी करण्याची व कामाच्या स्वरुपानुसार फेरबदल करण्याची मुभा, विक्रीकर आयुक्तांना देण्यात आली आहे. विक्रीकर आयुक्तांना

देण्यात आलेल्या या अधिकाराची शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विकवि-१२१६/प्र.क्र.४/वि.प्र.४, दि.२६.०२.२०१६ अन्वये दि.३१.१२.२०१६ पर्यंत असलेली मुदत वाढविण्यात येत असून याद्वारे हे अधिकार विक्रीकर आयुक्तांना दि.३१.१२.२०१७ पर्यंत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१२४१४५८४७८८०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraya E Ghanavat

Digitally signed by Dattatraya E Ghanavat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e754dcfc3ad39b1f1ee734fb62ca6c0558ffcae55bba934d42bad451952ab66c, cn=Dattatraya E Ghanavat
Date: 2017.01.24 14:59:57 +05'30'

**( द.ए.घनवट )**
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

**प्रति,**

१) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर,
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र, नागपूर,
६) विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१३) कार्यासन अधिकारी, प्रशासन-४/वि.प्र.१,२,३,
१४) निवड नस्ती (वि.प्र.४)